प्रधानमंत्री ग्रामसडक योजना (PMGSY) व मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेसाठी (MMGSY) राज्य स्तरीय समितीचे पुनर्गठन करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन

ग्राम विकास विभाग,

शासन निर्णय क्रमांकः ग्रासयो २०१८/प्र.क्र.२३९/बांधकाम-१

बांधकाम भवन, ५ वा मजला, २५ मर्झबान पथ,

फोर्ट, मुंबई ४०० ००१.

दिनांक: २८ एप्रिल, २०२३.

वाचा-

१) **शासन निर्णय क्रमांकः** ग्रामविकास व जलसंधारण विभाग ग्रासयो-२००९/प्र.क्र.११३/यो-८, दिनांक ०९.०९.२०१०.
२) **शासन निर्णय क्रमांकः** ग्रामविकास व जलसंधारण विभाग ग्रासयो-२०१२/प्र.क्र.११३/यो-८, दिनांक २५.०९.२०१२.
३) **केंद्र शासनाचे पत्र क्र.**पी-१७०२५/३३/२०११/पी-३/रा.ग्रा.र.वि.सं., दि.०७.०५.२०१३.
४) **शासन निर्णय क्रमांकः** ग्राम विकास व जलसंधारण विभाग ग्रासयो-२०१२/प्र.क्र.२७५/यो-८, दिनांक २०.०७.२०१३.
५) **शासन निर्णय क्रमांकः** ग्रामविकास व जलसंधारण विभाग ग्रासयो-२०१३/प्र.क्र.४४६/यो-८, दिनांक १०.१२.२०१३
६) **शासन निर्णय क्रमांकः** सार्वजनिक बांधकाम विभाग विअसु-२०१५/प्र.क्र.२१८/इमारती-२, दिनांक १६.१२.२०१५.
७) **शासन निर्णय क्रमांकः** ग्रामविकास व जलसंधारण विभाग ग्रासयो-२०१६/प्र.क्र.३३१/यो-८, दिनांक ३०.०७.२०१६.
८) **शासन निर्णय क्रमांकः** ग्राम विकास विभाग ग्रासयो-२०१८/प्र.क्र.२३९/बांधकाम-१, दिनांक २५.१०.२०१८.
९) **शासन पत्र,** ग्रामविकास विभाग क्र.मुग्रायो-२०१९/प्र.क्र.७३/बांध-४. दि.२२/०१/२०१९.

**प्रस्तावनाः-**

प्रधानमंत्री ग्रामसडक योजनाही केंद्र शासनाची कालबद्ध स्वरुपाची महत्वाकांक्षी योजना आहे. सदर योजनेची अंमलबजावणी महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्थेंमार्फत करण्यात येत आहे. प्रधानमंत्री ग्रामसडक योजनेच्या धर्तीवर, राज्यशासन पुरस्कृत मुख्यमंत्री ग्रामसडक योजना सुरु करण्यात आली असून, सदर योजनेची अंमलबजावणी ही महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्थेंमार्फत करण्यात येत आहे.

२. ग्रामीण विकास मंत्रालय, भारत सरकार यांचेकडून प्राप्त मार्गदर्शक सुचनांस अनुसरुन संदर्भाधीन शासन निर्णयान्वये प्रधानमंत्री ग्रामसडक योजनेसाठी महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्थेच्या वित्तीय अधिकारांमध्ये या विभागाच्या संदर्भाधीन आदेशान्वये वेळोवेळी सुधारणा करण्यात आली आहे. त्यानुसार प्रधानमंत्री ग्रामसडक योजना व मुख्यमंत्री ग्रामसडक योजनांची कामे जलदगतीने व विहित वेळेत पूर्ण करण्याच्या दृष्टीने, प्रशासकीय मान्यता ते कार्यारंभ आदेश यादरम्यान होणारा कालापव्यय टाळण्यासाठी, तसेच संपूर्ण योजनेचे कार्यान्वयन जलदगतीने करुन परिणामकारकरित्या संनियत्रण करण्याच्या दृष्टीने कार्यकारी अभियंता / अधिक्षक अभियंता / मुख्य अभियंता / राज्य स्तरावर समित्या गठीत करण्यात आल्या असून वित्तीय अधिकारांचे विकेंद्रीकरण करण्यात आले आहे.

त्यानुसार राज्य स्तरावर मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, मुख्य अभियंता (प्रमंग्रासयो), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, पुणे व वित्तीय नियंत्रक (प्रमंग्रासयो/मुमंग्रासयो), ग्राम विकास विभाग यांचा समावेश असलेली समिती गठीत करण्यात आली आहे. सदर समितीमध्ये शासन स्तरावरील प्रशासकीय बाबी तपासण्यासाठी मंत्रालयीन सेवेतील अधिकाऱ्याचा समावेश करुन राज्य स्तरावरील निविदा समितीची पुनर्रचना करण्याची, तसेच प्रधानमंत्री ग्रामसडक योजना व मुख्यमंत्री ग्रामसडक योजनांची कामे जलदगतीने व विहित वेळेत पूर्ण करण्याच्या दृष्टीने, तसेच संपूर्ण योजनेचे कार्यान्वयन जलदगतीने करुन परिणामकारकरित्या संनियत्रण करण्याच्या दृष्टीने मा.अपर मुख्य सचिव (ग्राम विकास) यांच्या अध्यक्षतेखाली संनियंत्रण समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

प्रधानमंत्री ग्रामसडक योजना व मुख्यमंत्री ग्रामसडक योजनांची कामे जलदगतीने व विहित वेळेत पूर्ण करण्याच्या दृष्टीने राज्य स्तरावरील निविदा समितीचे पुनर्गठन करण्यात येत असून सदर समिती खालीलप्रमाणे असेल -

- **राज्यस्तर निविदा समितीः-**

| अनु. क्र. | अधिकाऱ्याचे पदनाम | समितीमधील पद |
|---|---|---|
| १. | मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था | अध्यक्ष |
| २. | मुख्य अभियंता (प्रमंग्रासयो), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, पुणे | सदस्य |
| ३. | वित्तीय नियंत्रक (प्रमंग्रासयो/मुमंग्रासयो), ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ४. | उप सचिव (प्रमंग्रासयो/मुमंग्रासयो), ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई तथा सदस्य सचिव, नियामक मंडळ / कार्यकारी समिती, महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था | सदस्य सचिव |

सदर राज्यस्तर निविदा समिती प्रधानमंत्री ग्रामसडक योजना व मुख्यमंत्री ग्रामसडक योजना या दोन्ही योजनेच्या निविदेचे कामकाज पाहील. तसेच, सदर राज्यस्तर निविदा समितीची कार्यकक्षा (निविदा स्विकृती, वित्तीय अधिकार, इत्यादी) वेळोवेळी करण्यात आलेल्या सुधारणानुसार पूर्वीप्रमाणेच राहील.

**२.** तसेच, प्रधानमंत्री ग्रामसडक योजना व मुख्यमंत्री ग्रामसडक योजनांची कामे जलदगतीने व विहित वेळेत पूर्ण करण्याच्या दृष्टीने, तसेच संपूर्ण योजनेचे कार्यान्वयन जलदगतीने करुन परिणामकारकरित्या संनियत्रण करण्याच्या दृष्टीने राज्य स्तरावर अपर मुख्य सचिव (ग्रामविकास) यांच्या अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे संनियंत्रण समिती गठीत करण्यात येत आहे -

- **राज्यस्तर संनियंत्रण समितीः-**

| अनु. क्र. | अधिकाऱ्याचे पदनाम | समितीमधील पद |
|---|---|---|
| १. | अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव (ग्रामविकास) | अध्यक्ष |
| २. | मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था | सदस्य |
| ३. | वित्तीय नियंत्रक (प्रमंग्रासयो/मुमंग्रासयो), ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ४. | उप सचिव (प्रमंग्रासयो/मुमंग्रासयो), ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई तथा सदस्य सचिव, नियामक मंडळ / कार्यकारी समिती, महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था | सदस्य सचिव |

सदर संनियंत्रण समिती राज्यातील प्रधानमंत्री ग्रामसडक योजना व मुख्यमंत्री ग्रामसडक योजनांच्या प्रगतीचा वेळोवेळी आढावा घेईल. तसेच, सदर योजनेतील कामे जलदगतीने व विहित वेळेत पूर्ण करण्याच्या दृष्टीने, तसेच संपूर्ण योजनेचे कार्यान्वयन जलदगतीने करुन योजनेचे संनियंत्रण करेल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०४२८१२५६००३७२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by PATIL PRASHANT VINAYAKRAO
Date: 2023.04.28 17:07:16 +05'30'

(प्रशांत पाटील)
उपसचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा. विधानपरिषद व विधानसभा सदस्य, विधानमंडळ, मुंबई.
२. मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
३. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.मंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव (ग्राम विकास व पंचायत राज) यांचे स्वीय सहायक, बांधकाम भवन, मुंबई.
६. सचिव, मुमंग्रासयो, ग्रामविकास विभाग, मंत्रालय,मुंबई.
७. वित्तीय नियंत्रक (प्रमंग्रासयो/मुमंग्रासयो), ग्राम विकास विभाग, मंत्रालय,मुंबई.
८. मुख्य अभियंता (प्रमंग्रासयो), ग्रामविकास विभाग, मंत्रालय,मुंबई
९. उपसचिव (प्रमंग्रासयो/मुमंग्रासयो), ग्राम विकास विभाग, मंत्रालय,मुंबई.
१०. महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखापरिक्षा) मुंबई / नागपूर.
११. राज्य गुणवत्ता समन्वयक (प्रमंग्रासयो), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, पुणे.
१२. अधीक्षक अभियंता (प्रमंग्रासयो), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, सर्व विभाग.
१३. कार्यकारी अभियंता (प्रमंग्रासयो), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, सर्व जिल्हे.
१४. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१५. निवासी लेखाधिकारी, मुंबई.

१६. आय.टी.नोडल अधिकारी (प्रमंग्रासयो), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, पुणे.

१७. कार्यासन अधिकारी (व्यय-१५/अर्थ-१७/वित्तीय सुधारणा-१/आ.पु.क.), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई

१८. कार्यासन अधिकारी (आस्थापना-१/रोख शाखा/वित्त-१/बांधकाम-२ व बांधकाम-४), ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

१९. निवड नस्ती (बांधकाम-१), ग्रामविकास विभाग, मंत्रालय,मुंबई.